उच्च शिक्षण संचालनालय (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील विभागीय सहसंचालक कार्यालये / महाविद्यालये / संस्था / वसतीगृहे येथील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षांनंतर सेवा पुनर्विलोकनासाठी "विभागीय पुनर्विलोकन समिती" व अभिवेदनावर विचार करण्यासाठी "विभागीय अभिवेदन समिती" गठित करणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक:संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३१०/म.शि.१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १० जानेवारी, २०२२

वाचा:- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा दिनांक १० जून, २०१९.

प्रस्तावना:-

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दिनांक १० जून, २०१९ च्या शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम ६५ मधील तरतूदींनुसार अधिकारी/कर्मचारी यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांचे सेवा पुनर्विलोकन करण्याकरिता एकत्रिक कार्यपध्दती विहीत केलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदींनुसार, उच्च शिक्षण संचालनालय (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील विभागीय सहसंचालक कार्यालये/ महाविद्यालये/ संस्था/ वसतीगृहे येथील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षांनंतर महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (प्रशासन शाखा-लिपिक संवर्ग), महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (महाविद्यालयीन शाखा) व महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (प्रशासन शाखा-लिपिक संवर्ग) यांच्या सेवा पुनर्विलोकनासाठी "विभागीय पुनर्विलोकन समिती" व यासंबंधीच्याअभिवेदनावर विचार करण्यासाठी "विभागीय अभिवेदन समिती" गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

उच्च शिक्षण संचालनालय (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील विभागीय सहसंचालक कार्यालये/ महाविद्यालये/ संस्था/ वसतीगृहे येथील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (प्रशासन शाखा-लिपिक संवर्ग), महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (महाविद्यालयीन शाखा) व महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (प्रशासन शाखा-लिपिक संवर्ग) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षांनंतर जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांच्या सेवा पुढे चालू ठेवण्यासाठी पात्रता आजमाविण्यासाठी विहीत निकषांच्या आधारे त्यांचे सेवा पुनर्विलोकन करण्याकरिता खालीलप्रमाणे "विभागीय पुनर्विलोकन समिती" गठित करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | सचिव/प्रधान सचिव/अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | सह/उपसचिव (म.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३ | सह/उपसचिव (तां.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४ | अवर सचिव/कक्ष अधिकारी (मशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी उच्च शिक्षण संचालनालय (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील विभागीय सहसंचालक कार्यालये/ महाविद्यालये/ संस्था/ वसतीगृहे येथील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (प्रशासन शाखा-लिपिक संवर्ग), महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (महाविद्यालयीन शाखा) व महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (प्रशासन शाखा-लिपिक संवर्ग) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवा पुनर्विलोकनासंबंधीचा प्रस्ताव शासनास सादर करतील. विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे अधिकारी सेवेत ठेवण्यास पात्र / अपात्र ठरतील अशा अधिकाऱ्यांची शिफारस अंतिमत: निर्णयासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १०.६.२०१९ च्य शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केल्यानुसार समुचित प्राधिकाऱ्यांस सादर करण्यात येईल. तसेच, विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे अधिकारी सेवेत कार्यरत राहण्यास निर्विवादपणे अपात्र ठरतील, अशा अधिकाऱ्यांचे पुनर्विलोकन संदर्भाधीन दिनांक १०.६.२०१९ च्य शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या सामान्य प्रशासन विभागाच्या “विशेष पुनर्विलोकन समिती” कडून करण्यात येईल.

३. सेवा पुनर्विलोकनाअंती सेवा पुढे चालू ठेवण्यास निर्विवादपणे अपात्र ठरलेल्या व नोटीस बजावण्यात आलेल्या अधिकारी यांच्या अभिवेदनावर विचार करण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १० जून, २०१९ च्या शासन निर्णयामधील विहीत तरतूदींनुसार “विभागीय अभिवेदन समिती” गठित करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | सचिव/प्रधान सचिव/अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह/उपसचिव (वि.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | अवर सचिव/कक्ष अधिकारी (मशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

(टिप- उक्त समितीतील अ.क्र. २ व ३ येथील अधिकारी हे पुनर्विलोकन समितीमधील अधिकाऱ्यांव्यतिरिक्त असावेत.)

४. विभागीय अभिवेदन समितीच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १०.६.२०१९ च्य शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-ड मध्ये नमूद केल्यानुसार समुचित प्राधिकाऱ्यांना सादर करण्यात येईल.

५. सदरहू सेवा पुनर्विलोकनासंबंधातील कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १० जून, २०१९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दती व सूचनांनुसार करण्यात येईल.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०११०१७२१४११२०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

DATTATRAYA RAMBHAU KAHAR

Digitally signed by DATTATRAYA RAMBHAU KAHAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER & TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=44c81ed7c5650383de2d3bd4939feb17be94c77ddf9380bfe3d4af1d10cfd393, serialNumber=6c5292c043ebba90984d77378c6e4fb506d9694e3e8f08dd386c5d3f42e79b10, cn=DATTATRAYA RAMBHAU KAHAR
Date: 2022.01.10 17:23:15 +05'30'

**(द. रा. कहार)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मा.विधानसभा सदस्य व मा.विधान परिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा/मूळ शाखा, मुंबई
१३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. मा. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे.
१७. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
१८. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर/मुंबई, महाराष्ट्र/मुंबई१/२.
२०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२३. मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२४. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. म.शि.-१ कार्यासन, निवडनस्ती